**डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ व्या जयंती वर्षानिमित्त डॉ.बाबासाहेब आंबेडकर मुक्तीभूमी स्मारक येवला, जि.नाशिक येथे विविध बांधकामे व सुशोभिकरण करणे इत्यादी कामासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सान्यावि-२०१९/प्र.क्र.२३९/बांधकामे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २१ डिसेंबर, २०१९.

वाचा :-

१) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.सान्यावि-२०१५/प्र.क्र.१६३/ बांधकामे,दि.९/१०/२०१५.
२) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बैठक-२०१६/प्र.क्र.४७५/ बांधकामे, दि.२४/३/२०१७.
३) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बैठक-२०१६/प्र.क्र.४७५/ बांधकामे, दि.१४/३/२०१८.
४) डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था (बार्टी), पुणे यांचे पत्र जा.क्र.बार्टी/ पुणे/तांत्रिक शाखा/येवला स्मारक/२०१९-२०/७५०८,दि.१०/१२/२०१९.

**प्रस्तावना :-**

भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त अनुसूचित जाती व नवबौध्द घटकासाठी ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्टया महत्व असलेल्या स्थळांचा विकास करण्यासाठी संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मा.मंत्री (सा.न्या.वि.स.वि.) यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली आहे. डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंतीवर्षानिमित्त आयोजित कार्यक्रमांत आवश्यकतेनुसार दिलेल्या तरतूदीच्या अधिन राहून योग्य ते बदल करण्याचे तसेच याबाबतचे प्रशासकीय व वित्तीय अधिकार समितीस देण्यात आलेले आहे. त्यानुषंगाने समितीने संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये २८ व संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये ११ ऐतिहासिक स्थळांच्या विकास कामांना मंजूरी प्रदान केली आहे. परंतु सदरहु स्थळांच्या यादीमध्ये डॉ.बाबासाहेब आंबेडकर मुक्तीभूमी स्मारक, येवला, जि.नाशिक या ऐतिहासि स्थळाचा समावेश नसल्याने व या ऐतिहासिक स्थळाला अनन्यसाधाराण महत्व असल्याने डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था (बार्टी), पुणे यांच्या कडून संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये सादर करण्यात आलेल्या रु.१४,९६,८६,३८२/- (अक्षरी रुपये चौदा कोटी शहान्नव लक्ष शहाऐंशी हजार तीनशे ब्यांशी फाक्त) इतक्या रकमेच्या विविध विकास कामांना मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंतीनिमित्त डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था (बार्टी), पुणे यांच्या कडून डॉ.बाबासाहेब आंबेडकर

मुक्तीभूमी स्मारक, येवला, जि.नाशिक येथील विविध विकास कामांच्या रु.१४,९६,८६,३८२/- (अक्षरी रुपये चौदा कोटी शहान्नव लक्ष शहाऐंशी हजार तीनशे ब्यांशी फाक्त) इतक्या रक्कमेच्याखर्चास पुढील अटींच्या अधिन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) सदर काम सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करण्यात यावे.

२) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

३) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

४) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१०/१/२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

५) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१७/ प्र.क्र.६०/ इमारती-२, दि.७/७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

६) सदर कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास मुख्य अभियंता, नाशिक यांच्याकडून तांत्रिक मान्यता प्राप्त केल्यानंतरच विहित पध्दतीने काम सुरु करावे.

२. प्रस्तुत कामावरील खर्च हा "मागणी क्र एन-३, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीय व अल्पसंख्याक यांचे कल्याण, ०१-अनुसूचित जातीच कल्याण ७८९-अनुसूचित जाती घटक योजना, ०२ भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांची जयंती साजरी करणे (योजनांतर्गत-दत्तमत्त) लेखाशीर्ष २२२५ डी८२३" या लेखाशीर्षाखाली उपलब्ध तरतुदीतुन खर्ची टाकण्यात यावा.

३. या करीता आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत असून, त्यांनी या कामासाठीचा निधी, वित्त विभागाने विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार त्या त्या टप्प्यावर सदरहू कामाकरीता वितरीत करावा.

४. प्रस्तुतचा शासन निर्णय, दि.९/१०/२०१५ च्या शासन निर्णयान्वये गठित समितीस प्राप्त अधिकार तसेच वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका,१९७८, भाग पहिला, उपविभाग-पाच, अनु.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ व शासन निर्णय वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दि.२०/०९/२०१९ व शासन परिपत्रक सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५/०९/२०१९ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१२२११११४२५७९१२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2019.12.21 12:19:25 +05'30'

**(अ. कों. आहिरे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४. मा.राज्यमंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
५. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे.
६. महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था (बार्टी), पुणे.
७. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे.
८. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक.
९. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक.
१०. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (पूर्व) विभाग, नाशिक.
११.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा), महाराष्ट्र१/२, मुंबई/ नागपूर.
१२.प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, नाशिक.
१३.सहायक आयुक्त, समाजकल्याण, नाशिक.
१४.जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
१५.निवडनस्ती / बांधकामे.